# महाराष्ट्र शासन

क्रमांक : गौखनि -३४/०५१९/प्र.क्र.२३९/ख-१

महसूल व वन विभाग
हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: १३ नोव्हेंबर, २०२०.

**विषय : गौण खनिज- जळगांव**
**मौजे रुंधाटी, ता.अंमळनेर या वाळूगटाची रक्कम परत मिळणेबाबत.**
**सुनंदाई बिल्डर ॲण्ड डेव्हलपर्स तर्फे श्री. दिपक सुधाकर पाटील**

**शासन ज्ञापन:**

जिल्हाधिकारी, जळगांव यांना त्यांचे पत्र क्र. गौणख/ई-कावि/२०२०/८/२६/१८६, दि. १५/०२/२०२० रोजीच्या उपरोक्त विषयावरील पत्रास अनुलक्षून असे कळविण्यात येते की, दिनांक १६/०३/२०१९ रोजीच्या वाळूलिलावात सन २०१८-१९ या वर्षाकरीता मौजे रुंधाटी, ता. अंमळनेर या वाळूगटाचा लिलाव सुनंदाई बिल्डर ॲण्ड डेव्हलपर्स तर्फे श्री. दिपक सुधाकर पाटील यांना ४२४० ब्रास वाळूसाठ्याकरीता रू. १,३९,४१,०१०/- एवढ्या सर्वोच्च बोलीस मंजूर करण्यात आला होता. लिलावधारकाने लिलावाच्या सर्व रकमा विहित कालावधीत शासनजमा केल्या असून, लिलावधारकास वाळूगटाचा ताबा दिनांक २८/०३/२०१९ रोजी देण्यात आला.

२. मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे दाखल रिट याचिका क्र. ३६००/२०१९ च्या अनुषंगाने शासन पत्र दिनांक २८/०५/२०१९ अन्वये मा. उच्च न्यायालयाकडून स्पष्टीकरण होईपर्यंत वाळूगटातून वाळू उत्खनन व वाहतूकीस स्थगिती देण्याबाबत कळविण्यात आले होते. त्यानुसार अपर जिल्हाधिकारी जळगांव यांनी दिनांक २८/०५/२०१९ च्या पत्रान्वये कळविल्यानुसार लिलावधारक यांच्याकडुन चालू असलेले उत्खननास स्थगिती देण्यात आली. तद्नंतर शासनपत्र दिनांक ०७/०६/२०१९ अन्वये कळविल्यानुसार सदर स्थगिती दिनांक १०/०६/२०१९ रोजी उठविलेली आहे. त्यामुळे मा. न्यायालयीन प्रकरणांमुळे वाळूगटातून १३ दिवस उत्खनन थांबविण्यात आले होते.

३. तसेच सदर वाळूगटाची मुदत १५/०८/२०१९ पर्यंत होती. परंतु ग्रामस्थांच्या विरोधामुळे व न्यायालयीन प्रकरणांमुळे मंजूर वाळूचे उत्खननन करता येणे शक्य नसल्याचे लिलावधारकाने अपर जिल्हाधिकारी यांना दिनांक ०१/०८/२०१९ च्या पत्रान्वये कळविले असुन, लिलावधारकाने वाळूगटाचा ताबा दिनांक ०२/०८/२०१९ रोजी परत केला असल्याचे मंडळ अधिकारी यांच्या पंचनाम्यानुसार दिसून येत आहे. अशा प्रकारे मा. न्यायालयीन प्रकरणामुळे १३ दिवस लिलावधारकास उत्खनन आले नाही. तसेच ग्रामस्थांच्या विरोधामुळे मंजूर कालावधीच्या १४ दिवस आधी वाळूगटाचा ताबा परत करण्यात आला.

४. लिलावधारक यांना न्यायालयीन प्रकरण व ग्रामस्थांचा विरोध यामुळे वाळूचे उत्खनन न करता आलेल्या एकूण २७ दिवसांची प्रमाणशीर रक्कम रू.२६,६९,४१३/- (रुपये सव्वीस लाख एकोणसत्तर हजार चारशे तेरा फक्त) इतकी रक्कम लिलावधारकास परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

५. लिलावधारक यांना रक्कम रू.२६,६९,४१३/- (रुपये सव्वीस लाख एकोणसत्तर हजार चारशे तेरा फक्त) इतकी रक्कम, त्यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

६. या बाबीवर होणारा खर्च सन २०२०-२१ यावर्षाकरीता लेखाशिर्ष, “०८५३ - अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व

धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६)" खाली उपलब्ध असलेल्या अंदापत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

७. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.८/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२०१११३१५०८५०४६१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dinesh Rohidas Chavan

Digitally signed by Dinesh Rohidas Chavan
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revnue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, serialNumber=d7a3efb83c71550e7060464887488d786195babfc16e43c026a74ce9f913a2bc, cn=Dinesh Rohidas Chavan
Date: 2020.11.13 15:11:59 +05'30'

**( दिनेश चव्हाण )**
अवर सचिव, महसूल व वन विभाग

**प्रति,**

जिल्हाधिकारी जळगांव, जळगांव

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई - ४०० ०२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई- ४०० ०२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी जळगांव, जळगांव.
५) वित्त विभाग, (व्यय-९/ अर्थसंकल्प -३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.
६) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.
७) निवडनस्ती "ख" कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.